२१ मे,२००४ हा दिवस "दहशतवाद व हिंसाचार विरोधी दिवस" म्हणून पाळण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (विशेष)
क्रमांक:- एमआयएस २००४ / प्र.क्र. १५१ / विशा-१ (ब),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक: १७ मे २००४.

## परिपत्रक

केंद्रिय गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचेकडून २१ मे, हा दिवस "दहशतवाद व हिंसाचार विरोधी दिवस" म्हणून पाळण्यात यावा अशा सूचना आहेत. त्यानुसार २१ मे हा दिवस राज्यभर *"दहशतवाद व हिंसाचार विरोधी दिवस"* म्हणून पाळण्यात यावा असे शासनाचे आदेश आहेत हा दिवस खालीलप्रमाणे दिलेल्या उद्दिष्टाप्रमाणे पाळण्यात यावा.

१) शाळा, महाविद्यालये आणि विद्यापिठे यामध्ये वादविवाद व चर्चा आयोजित करणे.

२) दहशतवाद .आणि हिंसाचाराच्या धोक्यासंदर्भात परिसंवाद/चर्चा सत्र व्याख्याने आयोजित करणे.

३) वृत्तपत्रे, नियतकालिक, मासिके, आकाशवाणी आणि दुरदर्शन इत्यादी माध्यमाद्वारे तसेच भिंतीपत्रके आणि पत्रके यामधून योग्य प्रकारे प्रचार करुन, दहशतवाद आणि हिंसाचाराविरुध्द जनजागृती करण्यासाठी ठोस आणि अविरत मोहिम उघडणे.

४) दहशतवाद आणि हिंसाचाराचे दुष्परिणाम ठळकपणे निदर्शनास आणून देण्यासाठी सामुदायिक शिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विख्यात क्रिडापटू, चित्रपट अभिनेते आणि अन्य मान्यवर व्यक्तींच्या सहमार्गाने इलेक्ट्रॉनिक मुद्रण माध्यमाचा कल्पक वापर करणे आणि दहशतवाद व हिंसाचार विरोधी चमकदार घोषणा लिहिलेले टी-शर्ट वाटणे.

५) स्वयंसेवा संघटना, सामाजिक व सांस्कृतिक संस्था यांना व्याख्याने, भाषणे, चर्चा, संगीत व पठणाचे कार्यक्रम आणि सांस्कृतिक समारंभ यांच्याद्वारे कार्यक्रम आयोजित करण्यास सांगणे.

६) दहशतवाद/हिंसाचार विरोधीसाठीची ही प्रतिज्ञा सर्व शासकीय कार्यालयामधून सार्वजनिक क्षेत्र उपक्रमामधून व इतर सार्वजनिक संस्थामधून घ्यावयाची आहे.

२. २१ मे, २००४ ह्या दिवशी दहशतवाद व हिंसाचार विरोधी प्रतिज्ञा घ्यावयाची आहे. या प्रतिज्ञेचा नमुना सोबत जोडला आहे.

३. प्रसिध्दी संचालनालयाने निरनिराळ्या प्रसिध्दी माध्यमाद्वारे कार्यक्रमास प्रसिध्दी द्यावी.

४. सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी आपापल्या कार्यक्षेत्रातील सर्व संबंधितांची मदत घेवून हा कार्यक्रम आयोजित करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : प्रतिज्ञापत्र

( प्र. बा. हिर्लेकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग (विशेष)

विना टपालाने,
प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व विभाग प्रमुख, महाराष्ट्र शासन,
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
सामान्य प्रशासन विभाग,
(कार्यक्रम मंत्रालयात आयोजित करण्याच्या विनंतीसह)

--------

## दहशतवाद व हिंसाचार विरोधी दिवसाच्या निमित्ताने घ्यावयाची प्रतिज्ञा

आम्ही, भारताचे नागरिक, आपल्या देशाच्या अहिंसा व सहिष्णुतेच्या परंपरे विषयी दृढ निष्ठा बाळगुन याद्वारे, सर्व प्रकारच्या दहशतवादाचा व हिंसाचाराचा आमच्या सर्व शक्तीनिशी मुकाबला करण्याची गांभीर्यपूर्वक प्रतिज्ञा करत आहोत. आम्ही प्रतिज्ञा करतो की, आम्ही सर्व मानवबंधूमध्ये शांती, सामाजिक एकोपा आणि सामंजस्य टिकवू व वर्धिष्णू करु, तसेच मानवी जिवीत आणि मुल्ये धोक्यात आणणाऱ्या विघटनकारी शक्तींचा प्रतिकार करु.

********